# मेघदूत



समश्लोक, समवृत्त व
सयमक मराठी अनुवाद



चिं. द्वा. देशमुख

महाकवि कालिदासाचें

# मेघदूत

( समश्लोक, समवृत्त व सयमक मराठी अनुवाद )



अनुवादकर्ता :

चिंतामण द्वारकानाथ देशमुख

सन १९५२



मूल्य एक रुपया

गुरुवर्य श्री. रामचन्द्र कृष्ण लागू

यांस

प्रेमादरपूर्वक अर्पण

" म्हणोनि जाणतेन गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे
जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ "

ज्ञानेश्वरी. अध्याय १, ओंवी २५

# मेघदूत



## पूर्वमेघ

एका यक्षाकडुनि घडला आत्मकार्यांत दोष
वर्षान्त स्त्री-विरह-जड दे शाप त्याला धनेश
त्यानें लुप्तप्रभ वसत तो रामगिर्याश्रमांत
सीतास्नानें उदक जिथलें पूत, झाडी निवान्त १

प्रेमी कान्ता-विरहिं अचलीं घालवी मास कांहीं
गेलें खालीं सरुनि वलय स्वर्ण हस्तीं न राही
आषाढाच्या प्रथम दिनिं तो मेघ शैलाग्रिं पाहे
दन्ताघातें तटिं गज कुणी भव्यसा खेळताहे २

त्याच्या कैसातरि पुढतिं ये, चित्त वेधून जात
दाटे कंठ, द्रविणपतिचा दास होई सचिन्त
आनंदी ही विकल हृदयीं पाहतां मेघ, दूर
तो कैसा हो प्रियजन मिठी ज्यास देण्या अधीर ३

व्हावा जीवा पुढतिं सखिच्या आसरा श्रावणांत
मेघाहातीं कुशल म्हणुनी पाठवूं ये मनांत
त्यातें ताजीं कुटज-कुसुमें अर्घ्य देण्यासि वेंची
संतोषोनी वदत वचनें प्रेमळ स्वागताचीं ४

धूम्राग्नीचा पवनसलिलीं मेळ तो मेघ कोठें
वार्ता नेणे समुचित कुठें सेंद्रिय प्राणियांतें
उत्कण्ठेनें नच गणुनि हें गुह्यकें प्रार्थिलें त्या
कामार्तांना जड अजड हें भान नाहींच जात्या ५

जन्मा येशी सुविदित कुळीं पुष्करावर्तकांच्या
इच्छारूपी अमरपतिच्या तूं शिरीं सेवकांच्या
दुर्दैवें मी स्वजनविरहीं यामुळें तूज यांचीं
'ना' श्रेष्ठांची तरि हि बरवी 'हो' नको दुर्जनाची ६

संतप्तांचा असिसि जलदा आसरा तूं, निरोप
कान्तेला दे, विरह घडवी आमुचा स्वामि-कोप
यक्षेशाचें नगर अलका तेथ जा, सौध जेथ
बाह्योद्यानीं वसत हर तच्चंद्रिका द्योतवीत ७

वातारूढा बघतिल तुला पान्थ-दारा स्वहस्तें
केशाग्रांना उचलुनि, मनीं धीर येई तयांतें
येसी जेव्हां कवण विरही श्रीस सोडोनि राही
माझें तैसें परवश जिणें निश्चयें ना कुणाही ८

प्रेरी मार्गीं हळुहळु तुला वायु जैसा सुखाचा
वामांगानें मधुर रव हो संगती चातकाचा
गर्भाधान-क्षण उमजुनी अंतरिक्षीं, सुरेखा
तूझ्या संगें उडतिल नभीं मालिकेनें बलाका ९

मार्गान्तीं ती खचित तुजला भ्रातृजाया दिसेल
आहे जीवा धरुनि, दिवसां मोजुनी भर्तृशील
स्त्रीचें प्रेमी हृदय विरहीं जें फुलाचे समान
जावें प्राया क्षणिं गळुनि त्या ठेवि आशा धरून १०

जी पृथ्वीला सफल करिते उद्गतें कन्दजातें
ती ऐकोनी श्रुतिसुख तुझी गर्जना, मानसातें
उत्कण्ठेनें निघुनि मिळती सोबती राजहंस
कैलासाच्या पथिं, कमलिनी-तन्तु पाथेय ज्यांस ११

आलिंगावा प्रणयि निघतां उंच हा अद्रिमित्र
पार्श्वीं ज्याच्या उमटलिं पदें राघवाचीं पवित्र
तुम्ही दोघे उचित समयीं भेटतां तों कळोनी
येई प्रेमा चिर-विरहिंचीं उष्ण बाष्पें गळोनी १२

ऐकें मार्ग प्रथम कथितों जो तुवां आक्रमावा
तो सन्देश श्रवणिं मग जो लक्ष देतां रमावा
जेव्हां जेव्हां श्रमसि पथिं घे अद्रिशृंगीं विसावा
येतां ग्लानी उदक हलकें पी नद्यांचें मुखें वा १३

“ वारा नेई गिरिशिखर हें ! ” मुग्ध ऐशा विचारीं
डोला तूझ्या बघति चकिता उन्मुखी सिद्धनारी
सोडीं स्थाना सरस-निचुला या, निघें उत्तरेला
दिङ्नागांची पथिं चुकवुनी स्थूल हस्तावहेला १४

नाना रत्नें झळकति जणूं एकठायीं समोर
अर्धें इन्द्रायुध वरि निघे वारुळांतूनि दूर
त्या योगानें जलधर निळा फार तूं शोभशील
पिच्छें जैसा रुचिर शिखिच्या सांवळा नंदबाळ १५

तूझ्या हातीं कृषिफल असें जाणुनी लक्षितील
तूंतें प्रेमें कृषक-वनिता नेत्र ज्यांचे अलोल
मालक्षेत्रें चढ उखळितां नांगरें ज्यां सुवास
डावा थोडा वळ, मग पुन्हां शीघ्र जा उत्तरेस १६

दावाग्नीला शमवुनि जसा खिन्न चालून वाट
येसी तेव्हां तुज गिरि शिरीं घेतसे आम्रकूट
आभारातें विसरत नसे क्षुद्रही आश्रयाला
येतां मित्र स्मरण न कसें त्यापरी श्रेष्ठशीला १७

वन्याम्रांचा बहर उजळी अद्रिला अंगिं अंगीं
काळा केशासम जंव तिथें होसि आरूढ शृंगीं
देवद्वंद्वें गणतिल मनीं शैल तो त्या सुयोगीं
अग्रीं श्याम स्तन अवनिचा गौर शेषीं विभागीं १८

थांबें शैलीं अचिर, शबरी सेविती कुंज जेथें
होतां वृष्टि त्वरित पुढच्या आक्रमावें पथातें
रेवा वाहे उपलविषमीं विन्ध्यपादीं विशीर्ण
शृंगाराचे जणुं करिवरी रेखिले भिन्न वर्ण १९

वर्षांनीयां, वनगजमदें उग्र ज्या गन्ध येई,
कुण्ठे जम्बूवनिं, जल तिचें सेवुनी मार्ग घेईं
अन्तःसारा तुज हलविण्या वायुची काय शक्ती
सम्पन्नाची महति, अवघे रिक्त ते तुच्छ होती २०

नीपा अर्धे खुलुनि करिती केसर श्यामरक्त
आर्द्र स्थानीं प्रथमकलिका कर्दळींनाहि येत
मृद्गंधातें, दरवळत जो, हुंगुनी काननांत
मार्गा तूझ्या हरिण चरतां दाविती वृष्टि जेथ २१

तूं मत्कार्यावरि जरि सख्या सिद्ध वेगें निघाया
शैलीं शैलीं सुरभि-कुटजीं वेळ जाईल वांया
केका-शब्दें सजलनयन स्वागतातें मयूर
येतां, यत्नें झडकरि पुढें चालण्या हो तयार २२

उद्यानांचीं धवल फुलती कुंपणें केतकीचीं
वृक्षीं वृक्षीं घडति घरटीं मार्गि काकादिकांचीं
काळा जम्बूफलभर खुले माळव्याच्या वनांस
त्वत्सान्निध्यें गमनसमया जाणिती राजहंस २३

ख्याता साऱ्या जगतिं त्रिदिशा राजधानी तयाची
तेथें पावें म्हणिं सफलता तूं विलासीपणाची
तीरीं पीतां गरजुनि जला बेटवेच्या रसाळा
सभ्रूभंगा युवतिवदना कीं जणूं वीचिलोला २४

तेथें नीचैर्गिरिवरि जरा घेत विश्राम थांबें
त्वत्संगें जो पुलकित जणूं फुल्लपुष्पें कदंबें
जेथें गुंफा रतिपरिमळें पूर्ण वारांगनांच्या
तारुण्यातें प्रगट करिती उत्कटा नागरांच्या २५

विश्रामोनी चल वननदीतीरिं जे बाग तेथें
सिंचोनीयां नवजलकणें तूं जुईच्या कळयांतें
गालीं स्वेदा पुसुनि सुकलीं कर्णपद्में जयांचीं
छाया देतां क्षणिक रुचि घे माळिणींच्या मुखांची २६

नाहीं वाटेवरि जरि तया उत्तरे जो निघाला
जा भेटोनी विमुख नच हो उच्चसौधा विशाला
जेथें विद्युत् चमकुनि भयें लोल नारीकटाक्ष
चित्ता तूझ्या जरि न हरती जाण तूं निष्फलाक्ष २७

जीची चंचल्लहरिमुखरा मेखला पक्षिराजि
जाणों नाभि स्खलितगतिनें दाविते भोंवरा जी
ती निर्विन्ध्या पथिं जंव मिळे सेविं तीच्या रसास
स्त्रीची कान्ताजवळि पहिली प्रेमभाषा विलास २८

गेलासी तों अटुनि दिसते धार वेणीप्रमाणें
तीतें देती तटतरुतळीं पाण्डुता शुष्क पानें
त्वद्भाग्याचा विरहित-दशा देत तीची पुरावा
ज्यायोगें ती त्यजिल कृशता तो विधी आचरावा २९

पूर्वोक्ता ती सधन नगरी माळव्याची पहावी
वृद्धांतोंडीं उदयनकथा जेथल्या सर्व गांवीं
स्वर्गस्थांनीं सुकृत घटुनी जन्मतां मृत्युलोकीं
शेषें पुण्यें रुचिर हरिला स्वर्गिंचा भाग जी कीं ३०

जो विस्तारी सरस मधुरां कूजितां पक्षियांच्या
प्रातःकाळीं फुललिं कमळें वाहि गन्धा तयांच्या
शिप्रावायू हरित रतिची ग्लानि जेथें स्त्रियांची
देई अंगां सुख, जणुं सखा प्रेमसंगासि याची ३१

तेथें हाटीं सुघटित-मणी हार ते पाणिदार
पाचू जैसें गवत हिरवें फांकिती तेज दूर
शिंपा शंख प्रचुर बघुनी पोंवळीं भिन्नजात
वाटे चित्ता जलचि नुसतें राहिलें सागरांत ३२

घे विश्रांती भवनिं तिथल्या जो सुगन्धी फुलांनीं
लक्ष्मी रंगीं उमटलि जिथें सुंदरी-पादचिन्हीं
प्रेमें देती तुज गृहशिखी देणगी नृत्यरूप.
पोषी जालोद्गत अलक जो आंचवायासि धूप ३३

तेथें स्थान त्रिभुवनपति-श्रीहराचें भजावें
स्वामिग्रीवेसम गण तुझी पाहती कान्ति भावें
उद्यानातें पवन हलवी, गंधवत्यम्बुजांचा
तैसें तोयीं रमति रमणी गन्ध वाहे तयांचा ३४

जासी अन्या समयिंच जरी तूं महाकालिं, तेथें
थांबावें जोंवरि तरणिचें बिंब अदृश्य होतें
सन्ध्यापूजेमधिं शिवपदीं श्लाघ्य गंभीरताल
डंका होसी फल तुज पुरें गर्जनांचें मिळेल ३५

तेथें नृत्यें रुमझुमति जों मेखला, खेळवीतां
रत्नोद्भासें जडित चंवरी शीण येऊनि हातां
वेश्या येतां नखपदिं तुझ्या वर्षणाचे तुषार
दीर्घा दृष्टी तुजवरि अलिश्रेणिशा सोडितील ३६

जें बाहूंचें तरुवन उभें मंडलें तेथ लीन
सन्ध्यातेजें मग नवजपापुष्पसा रक्तवर्ण
नृत्यारंभीं पुरविं करिचें आर्द्रचर्म प्रभूला
गौरी धैर्यें अचल नयनीं पाहु दे भक्तलीला ३७

तेथें रात्रीं निघति रमणी वल्लभाच्या गृहांतें
अंधाराच्या पटलिं न दिसे राजमार्गीं तयांतें
वीजांनीं, ज्या जणुं निकषिंच्या स्वर्णरेखाचि, पन्थ
दावीं, वर्षाध्वनि न करिं वा गर्जना, त्या भयातें ३८

भार्या विद्युत् बहु विलसुनी श्रांत होतां निशेतें
कादीं कोठें उपरि भवनीं पारवे सुप्त जेथें
शेषा मार्गा फिरुनि धर वा पाहतां सूर्यबिंब
हातीं घेतां न जन करिती मित्र-कार्यीं विलंब ३९

अन्यासक्त प्रिय समजवी रुष्ट कान्ते सकाळीं
तीचे अश्रू पुसुनि म्हणुनी भानुचा मार्ग टाळीं
तोही अश्रूपरि दंव मुखीं पद्मिनीच्या पुसेल
या यत्नातें कर पसरि, तूं आड येतां चिडेल ४०

गम्भीरेच्या विमल सलिलीं, कीं जसें शुद्ध भावीं
छायामात्रें शिरुनि, रुचिरा, मूर्ति तूझी भरावी,
दृग्पात त्वां चपल-शफरी-रूपि धीर स्वभावें
तीचे तेव्हां कमल-धवल व्यर्थ जाऊं न द्यावे ४१

जैसें किंचित् करधृत तिचें वेत्रशाखांत लीन
घेशी नीराम्बर तट-कटि-भ्रष्ट जेव्हां हरून
कैसा मित्रा नततनु पुढें चालशी त्या प्रसंगीं
आस्वादज्ञ त्यजिल कुणि कां स्त्री अनाच्छादितांगी ४२

वर्षावानें प्रकटित तुझ्या रम्य गन्धें धरेच्या
शुण्डारन्ध्रीं सळसळ करी सेवनीं जो करींच्या
तूं येतां देवगिरिजवळी तेथुनी वाहणारा
धीरे धीरे पिकविल वनीं उम्बरां गार वारा ४३

तेथें स्कन्द स्वपद करितो, पुष्पमेघस्वरूपें
स्वर्गंगेच्या सलिलिं भिजलीं त्यावरी वर्षि पुष्पें
तो वन्हीच्या मुखिं शशिधरें देवसेनावनार्थ
सूर्यापेक्षां प्रखर दिधलें सोडुनी तेज नूर्त ४४

तेजोलेखावलयि गळलें पिच्छ ज्याचें भवानी
वात्सल्यानें कुवलयदलापाशिं घाली स्वकर्णी
ज्याच्या नेत्रां हरशशिकरें शुभ्रता येत बर्ही
स्कन्दाचा तो कुहरिं घुमत्या नाचवीं गर्जनांहीं ४५

स्कन्दा ऐसें पुजुनि निघणें, सोडिती सिद्ध जाया-
संगें मार्गा तव भिजुनियां जाइ वीणा भयें या
भेटें खालीं उतरुनि नदीरूप ती कीर्ति भावें
जी धेनूंचें यजन करुनी जोडिली रन्तिदेवें ४६

पाणी घेण्या जंव उतरशी कृष्णवर्णापहारी
तीच्या पात्रीं पृथुल परि जें भासतें सान दूरीं
तेव्हां दृश्या गगनजन त्या पाहुनी मानतील
मोत्यांचा हा सर अवनिचा ज्यामधें स्थूलनील ४७

तीं लंघोनी स्वतनु नवलें मन्दसोरस्त्रियांस
पाहों यावी, सहजचि जयां भ्रूलतांचे विलास
कुन्दासंगें भ्रमर उडतो त्यापरी नेत्रिं ज्यांचे
पातें हाले तंव वरिवरी नीलिमा शुभ्रिं नाचे ४८

ब्रह्मावर्ती शिरुनि मग तूं बिंबमात्रेंच, साक्षी
क्षत्रांच्या जें तुमुल समरा तें कुरुक्षेत्र लक्षीं
तेथें शीर्षें खरशरशतें वर्षिलीं अर्जुनानें
राजांचीं, त्वां जणुं सरसिजें वारिधारासरानें ४९

तें सोडोनि प्रिय मधु जयीं रेवती-नेत्र-चिन्हें
बंधुप्रेमें समरविमुखें सेविलें जें हलीनें
तूंही सारस्वत सलिल तें सेविं बा, अंतरंगीं
लाधो शुद्धी तुजसिहि जरी कृष्णता मात्र रंगीं ५०

जा तेथोनी हिमवतिं हरिद्वारिं तूं जान्हवीतें
गेले स्वर्गा सगरज जिच्या पायरीच्या प्रपातें
फेनव्याजें भ्रुकुटिरचने जी उमेच्या हंसोनी
इन्दुस्पर्शी धरि हरजटा वीचिरूपी करांनीं ५१

जैसा कोणी सुरगज नभीं वांकतो पूर्वभागें
पाणी पीण्या स्फटिकसम तूं नम्र होण्यासि लागें
पात्रीं छाया तव सरकतां जान्हवीच्या पडोनी
होई वाटे रुचिर यमुना-भेट अन्या ठिकाणीं ५२

जातां शैलीं हिमधवल जो उद्गमप्रान्त तीचा
यत्पाषाणीं हरिण बसुनी गन्ध ये कस्तुरीचा
शृंगीं मार्गश्रम शमविण्या बैसतां शोभशील
शुभ्रीं नन्दीशिरिं उकरिलें कीं जसें पंकजाल ५३

धारा वाहे तंव भडकुनी घर्षतां देवदार
त्यांतें दाव ज्वलितचमरीकेश जांचील फार
तों टाकीं त्या शमवुनि सरी सोडुनी तूं जलाच्या
आर्तत्राणें खचित सुफला संपदा उत्तमांच्या ५४

त्यांच्या मार्गा त्यजसि जरि तूं जे तुझ्या लंघनार्थ
वेगें व्योमीं शरभ उडती स्वांग मोडोनि घेत
वर्पीं गारा तुमुल करि त्यां जर्जर श्वापदांना
होती हास्यास्पद करिति जे निष्फला कार्ययत्ना ५५

श्रीशम्भूचे चरण उठले स्पष्ट तेथें शिलाङ्गीं
फेरी घालीं सविनय तयां, पूजिती ज्यांस योगी
पापांचें हो दलन दिसतां जे नरा भक्तिवंता
होई नित्या शिवगणपदीं योजना देह जातां ५६

वारा रंध्रीं शिरुनि मुरलीसारिखा वेळु वाजे
गाती गान त्रिपुरविजया किन्नरी सुस्वरा जें
होई तूझें ध्वनित कुहरीं जों मृदंगासमान
संगीताचा तंव हरपदीं संच होईल पूर्ण ५७

दृश्यस्थानें हिमगिरितटीं लंघुनी पोंचशील
हंसद्वार, प्रथित करि जें भार्गवा क्रौंचरंध्र
त्या रंध्रें जा चढुनि वरतीं, दीर्घ शोभें उभासा
श्रीरंगाचा चरण बलितें दाबण्या श्याम जैसा ५८

कैलासाचे तटिं अतिथि हो देवतादर्पणाचे
सांधे ज्याचे विघटित शिरीं बाहुंनीं रावणाचे
व्यापी पद्मामलशिखर जो तुंगतेनें नभास
गौरीशाचा प्रतिदिनिं जणूं सांठला अट्टहास ५९

जाशी जेव्हां तटनिकटिं तूं कज्जलें तुल्यवर्ण
त्या शैलाच्या धवल नव जो हस्तिदंतासमान
तेव्हां शोभा अचलनयनीं ती पहावी गिरीची
गौरस्कन्धीं मिरवित जशी नीलचैलें हलीची ६०

क्रीडाशैलीं सहल करण्या पार्वती तेथ येतां
सर्पाच्या त्या त्यजुनि वलया शम्भुनें दत्तहस्ता
अन्तर्धारा थिजवुनि करीं देह सोपान-पांक्ति
हो सामोरा मणितट तुझ्या पायऱ्यांनीं चढो ती ६१

तेथें तीक्ष्ण त्रिदशयुवती टोंचुनी कंकणाग्र
कारंजें कीं करतिल तुझें निश्चयें मुक्तधार
ग्रीष्मीं येशी म्हणुनि सुटका ना मिळे तों निदानीं
क्रीडासक्ता भिवविं तरुणी घोर गर्जूनि कानीं ६२

जेथें होती कनककमलें, पी जला मानसाचे
हांसेचा हो मुखपट जलादानिं ऐरावताचे
जैसें वस्त्रां सुरतरुदलां हालवीं मारुतांनीं
अद्रिश्रेष्ठा अनुभविं असे खेळ नाना करोनी 　　　　　　६३

त्याच्या अंकीं बघुनि अलका वल्लभाच्याच जेवीं
जीचा गंगापदर सरला, स्वैर-गा, ओळखावी
वर्षाकालीं शिखरिं धरि जी मेघमाला सवर्प
मुक्ताजालें ग्रथित रमणी ज्यापरी केशपाश 　　　　　　६४

---

## उत्तरमेघ

जेथें सद्में त्वदुपम पहा होत नाना प्रकारीं
चित्रें इन्द्रायुधसम, विजेसारिख्या रम्य नारी
संगीताचा घुमत तुजसा मन्दनादें मृदंग
तूं नीरात्मा, मणितल तयां, तूं नि ते अभ्रतुंग १

हातीं नाचे कमल, अलकीं खोविलीं बालकुन्दें
लोध्राचें तें सुम-रज मुख-श्रीप्रति श्वतता दे
कानीं साजे शिरस, फुलली केशपाशीं अबोली
जेथें नारी अनुचर तुझे नीप सीमंतिं घाली २

जेथें पुष्पें तरुवरि सदा गुंगती मत्त भृंग
पद्में युक्ता सतत नलिनी भोंवतीं हंस-संघ
टाहो देती कधिं न मुकतां पिच्छ-शोभेस मोर
रात्रीं रात्रीं तिमिर नुरतां चांदण्याची बहार ३

आनंदाश्रू, जल न दुसऱ्या कारणें, नेत्रिं जेथ
तापा, ज्यातें निववि दयित-प्राप्ति, त्या काम देत
नाहीं तैसा प्रणयकलहावीण विश्लेप सह्य
यक्षांचें ना वयच दुसरें यौवनाच्या शिवाय ४

ताराबिंबें उमटुनि सुमालंकृतीं, यक्ष जेथ
जाती स्वच्छस्फटिक-सदनीं सुंदरी-संगतींत
पीती कल्पद्रुम-मधु चढे ज्यामुळें प्रेमरंग
जों गंभीर ध्वनिसम तुझ्या मंद वाजे मृदंग ५

ज्यांना गंगा-पवन सलिलें शीत, सेवीत छाया
मन्दारांची तट-निकटिंच्या लभ्य तापा हराया
मुष्टि-क्षेपें मणि लपविला हैम वाळूंत त्याला
शोधावें हें रमति अमराभ्यर्थिता जेथ बाला ६

मुक्तग्रन्थी शिथिल कटिचें रेशमी वस्त्र जेथ
औत्सुक्यानें पटुतर करें ओढितां दूर नाथ
बिंबोष्ठी सभ्रम शरमुनी फेंकिती तो गुलाल
उच्चज्योतीवरति परि हो रत्नदीपांत फोल ७

प्रासादाग्रीं शिरुनि जिथल्या प्रेरिलेले समीरें
चित्रें तेथें नवसलिलजें दूषवोनी तुषारें
जाणों भ्याले जलधर झणीं जालमार्गें त्वदाप्त
धूम्राकारग्रहणिं कुशल व्यस्त बाहेर जात ८

जेथें होतां शिथिल दयितालिंगनें खेद अंगीं
जो नारींच्या सुरतज, तया झालरीचे पलंगीं
नेती दूर द्रव सुटुनियां चन्द्रकांत स्रवांनीं
त्वन्निर्मुक्तिप्रकट शशिच्या मध्यरात्रीं करांनीं ९

निःसीमश्री रसिक जिथले किन्नरांच्या समेत
जे कंठांनीं धनपतियश प्रत्यहीं गोड गात
संलापानें, परिवृत सदा अप्सरा मुख्य-वृंदें
वैभ्राजाख्यीं बहिरुपवनीं काल नेती प्रमोदें १०

वेगें जातां च्युत अलकिंची जेथ मन्दार-वेणी
पानें तैशीं कनक-कमलें भ्रष्ट कर्णांवरोनी
मुक्ताजाल, स्तन-विचलनें भग्न जे हार होती
हीं रात्रींचा पथ सुचविती कामिनींचा प्रभातीं ११

जेथें साक्षात् धनद-सख तो शम्भु राहे म्हणोनी
वाटे भ्याला रतिपति धनू भृंग-रज्जू न आणी
भ्रूसंकेतें अचुक नयनें वेधितां प्रेमि-लक्ष्य
साधे त्याचें पटु रमणिच्या विभ्रमें मात्र कार्य १२

नानारंगी वसन, नयनां मद्य जें नाचवीत
लेणीं नानाविध, नव फुलें पल्लवाच्या समेत
तैसें पादाम्बुज सजविण्या आळता जेथ यक्ष-
स्त्री-साजाला पुरवि सगळ्या एकला कल्पवृक्ष १३

अस्मद्गेह द्रविणपतिच्या उत्तरेला, जनांच्या
दृष्टीला ये दुरुनि धनुवत् कान्तिनें तोरणाच्या
मन्दाराचा नव-तरु तिथें पुत्रसा पाळिलेला
मत्कान्तेनें, लववििति कर-प्राप्य पुष्पें जयाला १४

वापी तेथें विरचित जिला घाट पाचू-शिळांचे
स्वर्णाम्भोजें फुलुनि भरली, नाल वैदूर्य ज्यांचे
तीच्या तोयीं वसति करिती हंस निश्चिन्त चित्तें
तूं आलासी तरि जवळच्या ध्यात ना मानसातें १५

कांठीं तीच्या सुबक वलयीं कांचनी कर्दळीचे
आहे क्रीडाचल शिखर ज्या रम्य नीलस्थलीचे
येई डोळयापुढतिं ह्मणिं तो आवडीचा सयेच्या
तूं तें पाहें जंव विकल मी मंडलीं त्वत्प्रियेच्या १६

कोरांटीचें वलय जवळीं माधवी-मण्डपातें
रक्ताशोक स्थिर-दल न जो केसर प्रेक्ष्य तेथें
इच्छी डावा चरण सखिचा एक, इच्छीत मी तें,
दूजा वाञ्छी वदन-मदिरा डोहळ्याच्या निमित्तें १७

स्वर्णा यष्टि स्फटिकफळिची तेथ पक्षी बसाया
रत्नांचा ज्या खुलत हिरव्या वेळुचा कींच पाया
सायंकाळीं तिजवरि तुझा मित्र तो मोर येत
ज्याला तालें ध्वनित-वलयें मत्प्रिया नाचवीत १८

या चिन्हांना स्मरुनि निपुणा आमुचें शोध सद्म
त्याच्या द्वाराजवळि बघ ते काढिले शंख-पद्म
शोभा त्याची खचित नुरली दूर जों मी प्रवासी
अस्ता जातां रवि विलय हो पद्मिनी-वैभवासी १९

छावा जैसा बनुनि करिचा शीघ्र जाण्यासि आंत
पूर्वोक्तीं त्या रुचिर-शिखरीं बैस क्रीडाचलांत
गेहीं दृष्टी तव शिरकुं दे सौम्य सौदामिनी ती
मन्दोन्मेषा, चमकत जणूं काजव्यांचीच पंक्ती २०

बिंबोष्ठी जी सुदति, तरुणी, लोचनांनीं कुरंगी
जैशी भ्याली, तनु-तर-कटी, गाढ-नाभी कृशांगी
श्रोणीभारें लघुपद न घे, अल्प वांके स्तनांनीं
वाटे हीच प्रथम विधिची मूर्ति नारी-विधानीं २१

ती जाणावी परिमित-वचा जीव माझा दुजा कीं
जातां दूरी सहचर जशी एकली चक्रवाकी
बाला कंठी अलघु दिन जे दुःखभारें, न जाणें
भासे अन्या जणुं करपली पद्मिनी कीं हिमानें २२

मत्कान्तेचे नयन सुजले रोदनें दुर्निवार्यें
उष्णोच्छ्वासें खचित अधरीं श्यामतेची छटा ये
अर्धव्यक्त स्वकरिं मुख तें ठेविलें मुक्तकेशीं
भासे क्षीणप्रभ शशि जसा दीन जों आड येसी २३

त्या वेळीं तूं बघशिल तिला गुंतलेली पुजेंत
मच्चित्रीं वा विरह-कृशता कल्पुनी रंगवीत
मैनेला वा पुसत, करि जी पंजरीं मंजु बोला
स्वामीतें कां स्मरसि रसिके? लाडकी तूं तयाला २४

किंवा वीणा मलिन-वसनीं अंकिं ठेवोनियां ती
माझ्या नांवावरि विरचिता सिद्ध गाण्यासि गीती
तारा ओल्या नयन-सलिलें वाजवीते प्रयासें
वारंवार स्वकृत तरिही नाठवे तान, भासे २५

शापाचे जे विरह-दिवसापासुनी शेष मास
मोजी पुष्पीं, भुइवर रची देहलींतील रास
मत्संगा वा स्मरुनि हृदयीं कल्पनास्वाद घे ती
चित्ता प्रायः पति-विरहिता यापरी रंजवीती २६

तीतें गांजी विरह दिनिं ना कार्यमग्नेसि तेवीं
रात्रीं शोका चढुनि भरती रंजनाभाविं जेवीं
मद्वार्तेनें बहु सुखविण्या अर्धरात्रीं सतीला
जागी पाहें खिडकिमधुनी शेज भूमीच जीला २७

दुःखें क्षीणा विरह-शयनीं कुक्षिनें ठेवि गात्र
राहे जैशी उदयिं घटुनी इन्दुची कोर मात्र
आनंदें जी क्षणसम निशा जात मत्संगतींत
उष्णाश्रूंनीं बहुल विरहें आज ती घालवीत २८

जाळीमार्गें अमृतमय जो चांदणें थंड येई
पूर्वप्रेमें वळत तिकडे तोंच माघार घेई
दृष्टी दुःखें सजल मिटिते पापण्यांनीं मलूल
ना जागे ना निजत जणुं कीं दुर्दिनीं सूर्यफूल २९

निःश्वासानें किसलय जसा वाळला ओंठ, गालीं
येती तेलाविण अलक जे रुक्ष ते दूर सारी
व्हावा स्वप्नीं तरि मजसवें संग ऐशा विचारें
इच्छी निद्रा परि नयनिं ती रोखली अश्रुपूरें ३०

मालात्यागें विरह-दिवशीं बांधिले केश त्यांची
शापान्तीं जी असुख सरुनी मीच सोडावयाची
दुःखस्पर्शा विषम बहुधा सारिते एक-वेणी
जी ये गालावरि तिज नखें वाढलेल्या करांनीं ३१

झाली दुःखें कृश, उतरलीं भूषणें मद्वियोगीं
अंगा शय्येवरि घडिघडी टाकिते कोमलांगी
दृश्यें अश्रूपरि नवजला ढाळशील स्वयेंची
प्रायः सारे सकरुण जयां आर्द्रता अंतरींची ३२

जाणें माझ्यावरति सखिचें प्रेम तूझ्या नितान्त
तीतें तेव्हां प्रथम विरहीं कल्पितों या दशेंत
नाहीं मातें करवित गड्या वल्गना भाग्यगर्व
जें जें बोलें बघशिल झणीं तें स्वयें तूंचि सर्व ३३

कुंठे ज्याचें भ्रमण अलकीं, पारखा काजळाला
भूलीलेला मुळिं विसरला वर्जितां वारुणीला
येसी तेव्हां नयन लवुनी तुल्यशोभा दिसेल
एणाक्षीचा चलित-कमळें मीन होतां विलोल ३४

चिन्हें आतां मुळिं न दिसती जेथ माझ्या नखांचीं
मोत्यांची ती नुरवित विधी नित्य जाळी सुखाची
संभोगान्तीं उचित चुरण्या मत्करांनींच, डावी
मांडी तीची कनक-कदली-तुल्य गौर स्फुरावी ३५

त्या वेळीं ती जरि अनुभवी सौम्य, निद्रा-क्षणांतें
पार्श्वीं बैसें प्रहर-भर तूं थांबवीं गर्जनांतें
यत्नें स्वप्नीं रमण दिसतां मी तिची गाढ भेट
ना हो सैल क्षणिं सुटुनियां बाहुंची कंठिं गांठ ३६

तीतें जागी करुनि पवनें शीत जो बिन्दु-योगें
जों श्वासा ती, खुलुनि कलिका मालतीची जशी, घे
ज्योतिर्युक्ता तुज निरखण्या दृष्टि देतां गवाक्षीं
धीरे लागें ध्वनितवचनें बोलण्या मानिनीशीं ३७

मी भर्त्याचा प्रियसख तुझ्या, मंगले, मेघ जाण
आलों तूझ्याजवळि हृदयीं शब्द त्याचे धरून
पान्थांना मी मधु-घन-रवें प्रेरितों, शीणले ते
उत्कंठेनें त्वरित गृहिणी-वेणि सोडावयातें ३८

सीता जैशी पवन-तनया उन्मुखी ऐकतां हें
सोत्कंठा ती फुलुनि हृदयीं आदरें तूज पाहे
एकाग्रत्वें परिशिल पुढें सांगणें जें, स्त्रियांची
वार्ता मित्राकडुनि अपुरी भेट जैशी प्रियाची ३९

हे आयुष्मन् तिज मम वचें व्हावयाही कृतार्थ
सांगावें कीं, पति तव वसे रामगिर्याश्रमांत
राहे स्वास्थ्यें, विरहिं पुसतो ‘ गेहिनी तूं खुशाल ? ’
प्राण्यांचे, ज्यां सुलभ विपदा, हेच कीं आद्य बोल ४०

अंगीं अंगा, कृशें अतिकृशा, तप्तिं दीप्तानलातें
सास्रीं अश्रु-प्रचुर, सतत-व्याकुलीं व्याकुलातें
उष्णोच्छ्वासीं, वसत सुदुरीं, दीर्घ निःश्वास देत
वैरी दैवें पथिं अडवितां लावितो कल्पनेंत ४१

बोलाया जें अनुचित नसे मैत्रिणींच्या समोर
तेंही कानीं कथित वदन-स्पर्श-लोभें अधीर
तो कानांचा विषय तुरला नेत्र-मार्गीं न राहे
औत्सुक्यानें जुळवुनि वचा मन्मुखें सांगताहे ४२

वेलींमध्यें वपु, दचकल्या एण-दृष्टींत नेत्र
केशां पिच्छ-प्रसरिं शिखिच्या, चंद्रबिंबांत वक्त्र
भ्रूभंगातें बघत लघुशा मी नदीच्या तरंगीं
नाहीं कोठें परि तव तुला भामिनी एक जागीं ४३

तूझी मूर्ति प्रणय-कुपिता गेरुचा जीस रंग
काढोनी जों चरणिं तिचिया ठेवण्या इच्छि अंग
तेव्हां माझी डबडबुनि हो अश्रुंनीं लुप्त दृष्टी
तेथें ही ना रुचत अपुल्या क्रूर दैवासि भेटी ४४

कष्टें स्वप्नीं मजसि दिसतां गाढ आलिंगण्यातें
तूतें जेव्हां भुज पसरतों अंतराळांत कान्ते
तेव्हां मातें बघुनि बहुधा अश्रु-बिन्दू लतांचे
पर्णीं मोतीं जणुं टपकति स्थानिंच्या देवतांचे ४५

कोंभाना जे उकलति बळें देवदारांत तेथें
अर्कस्रावें मग परिमलें लादले दक्षिणेतें
येती जे ते सजणि हिमवद्वायु आलिंगिले म्यां
पूर्वी यांनीं तव तनु असे स्पर्शिली कल्पुनीयां ४६

कैशी दीर्घप्रहर पळ-सी रात्र शीघ्र क्रमावी
किंवा कैशी तळमळ दिशीं सर्वकाळीं निमावी
इच्छीं वांया, तरल-नयने, ठाव कोठें मिळेना
चित्तीं पीडा तव विरहिंची तीव्र ही गे खळेना ४७

संकल्पांतें करुनि बहु मी आपुला रक्षिं जावें
तेव्हां तूंही हृदयिं सखये दे भयातें न ठाव
कोणा लाभे सुखचि अथवा दुःख ज्या पार नाहीं
च्याकीं खालीं वरि फिरतसे धाव, तैशी स्थितीही ४८

संपे शाप त्यजिल हरि जों आपुली शेष-शय्या
चौमासांतें नयन मिटुनी घालवीं राहिलेल्या
नाना इच्छा विरहिं मनिं ज्या घोळती त्या पुढें गे
भोगूं रात्रीं शरदिं जंव तें चांदणें पूर्ण रंगे ४९

हेंही सांगे : बिलगुनि मला एकदां तूं पलंगीं
होशी झोंपेमधुनि सहसा हुंदके देत जागी
त्या वेळीं म्यां बहुत पुसतां सस्मिता बोललीस
तूंतें स्वप्नीं रमवित, शठा, पाहिलें मी दुजीस ५०

जाणावें गे मम कुशल या ओळखीच्या खुणेनें
शंका माझ्याविषयिं नसुं दे बोलती लोक तेणें
माया लोपे विरहिं म्हणती व्यर्थ-ना भोगतांही
प्रीतिस्थानीं रस भरुनियां प्रेमराशी घडे ही ५१

आश्वासोनी प्रथम-विरहीं विह्वला भ्रातृजाया
नंदी ज्याचीं उकरि शिखरें शीघ्र सोडी नगा या
तीच्या शब्दीं कळवुनि तिचें क्षेम सांगोनि खूण
प्रातःकुन्दासम मम गळे जीव घे सांवरून ९२

का मित्राचें मम ठरविलें कार्य नेण्यासि पार
तूझ्या मौनावरुनि समजें खास मी ना नकार
पाणी देशी न वच वदतां मागत्या चातकांना
इच्छापूर्ति प्रतिवच भला हेंच दे याचकांना ९३

हें साधोनी हित मम जरी मागणें नानुरूप
सख्यें किंवा मजसि विरहीं होउनी सानुकंप
वर्षाकालें अधिक विभवा पावुनी, इष्टदेशीं
जाईं मेघा, विरह कधिंही ना तुझा हो विजेशीं ९४

मुंबई, १४-१-१९४३ चिं. द्वा. देशमुख

— समाप्त —